आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ वर्ग -१ जिल्हा शल्य चिकित्सक/जिल्हा आरोग्य अधिकारी/ विशेषज्ञ (वेतनस्तर एस-२३: ६७७००-२०८७००) या संवर्गातील तसेच सामान्य राज्य सेवा गट-अ वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी (सार्वजनिक विश्लेषक) संवर्गातील अधिकाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्वि-१०२५/प्र.क्र.४६/सेवा-२**

गोकुळदास तेजपाल रूग्णालय आवार,

संकुल इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.

तारीखः २१ मे, २०२५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र. एलपीएल-२०१७/ प्र.क्र.२१/ का. पंधरा, दि. १०.०६.२०१९

२) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. समिती-२०२०/प्र.क्र.२७/सेवा-२, दि. २०.०२.२०२०

३) मुख्य प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र. आआसे/कक्ष-१/टे-९/५०-५५ से.पु.प्र./सा.रा.से. गट अ/व.वै.अ. पदो./२७२/२५, दिनांक १३ जानेवारी, २०२५.

४) सह संचालक, (अ. व प्र.) आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र. आआसे/कक्ष-१/टे-९/५०-५५ से.पु.प्र./७३१०/२५, दिनांक २७ जानेवारी, २०२५.

५) सह संचालक, (अ. व प्र.) आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र. आआसे/कक्ष-१/टे-९/५०-५५ से.पु.प्र./८२७/२५, दिनांक ११ फेब्रुवारी, २०२५.

प्रस्तावना-

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, १९८२ च्या नियम १० (४) व ६५ नुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना वयाच्या ५०/५५ वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी, त्यांचे सेवा पुनर्विलोकन करुन त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे. त्याअनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.०१ येथील दि.१०.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सेवा पुनर्विलोकनासंबंधी कार्यपध्दती व सर्वसाधारण सूचना विहित केल्या आहेत. त्यास अनुसरुन आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ वर्ग -१ जिल्हा शल्य चिकित्सक/जिल्हा आरोग्य अधिकारी/ विशेषज्ञ (वेतनस्तर एस-२३: ६७७००-२०८७००) या संवर्गातील तसेच सामान्य राज्य सेवा गट-अ मधील वरिष्ठ

वैज्ञानिक अधिकारी (सार्वजनिक विश्लेषक) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सेवा पुनर्विलोकनाकरीता संदर्भ क्र. ०२ येथील दि. २०.०२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या अध्यक्षतेखाली विभागीय पुनर्विलोकन समितीची स्थापना करण्यात आली आहे. त्यानुषंगाने आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ वर्ग -१ जिल्हा शल्य चिकित्सक/जिल्हा आरोग्य अधिकारी/ विशेषज्ञ (वेतनस्तर एस-२३: ६७७००-२०८७००) या संवर्गातील तसेच सामान्य राज्य सेवा गट-अ मधील वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी (सार्वजनिक विश्लेषक) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांचे सेवा पुनर्विलोकन करण्यासाठीचा विहित प्रस्ताव आरोग्य सेवा आयुक्तालयाने संदर्भ क्र. ०३ ते ०५ अन्वये शासनास सादर केला असून विभागीय पुनर्विलोकन समितीने सदर अधिकाऱ्यांच्या सेवेचे मुल्यमापन करुन केलेल्या शिफारशीनुसार ज्या अधिकाऱ्यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी सेवेत राहण्यासाठी पात्र ठरविले आहे, त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

विभागीय पुनर्विलोकन समितीने केलेल्या शिफारशीस अनुसरुन आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ वर्ग -१ जिल्हा शल्य चिकित्सक/जिल्हा आरोग्य अधिकारी/ विशेषज्ञ (वेतनस्तर एस-२३: ६७७००-२०८७००) तसेच सामान्य राज्य सेवा गट-अ मधील वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी (सार्वजनिक विश्लेषक) या संवर्गातील खालीलप्रमाणे ०७ (सात) अधिकाऱ्यांची सेवा त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यानंतर चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | पदनाम व कार्यरत ठिकाण |
|---|---|---|
| १ | डॉ. अंजली व्ही.मोहळकर | वैद्यकीय अधिकारी (चर्मरोग व गुप्तरोग तज्ञ), सामान्य रुग्णालय, सातारा |
| २ | डॉ. (श्रीमती) तरंगतुषार श्रीहरी नागरगोजे | जिल्हा शल्य चिकीत्सक, सामान्य रुग्णालय, अकोला |
| ३ | डॉ. बालाजी मारोतीराव शिंदे | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, लातुर |
| ४ | डॉ. महेश महालिंग खलिपे | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा |
| ५ | डॉ. अर्चना भोसले | उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर (श्रेणी अवनत) |
| ६ | श्री. शहाजी बनगर | वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी, (सार्व. विश्लेषक),पुणे |

२. उपरोक्त निर्णयाची नोंद संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त अधिकाऱ्यांच्या सेवापुस्तकात घेण्याबाबत उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२११२५९३८४९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT PANDURANG GAIKWAD

Digitally signed by VASANT PANDURANG GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=6762a1c7f462bd961625d44d6971dc2c9f06f3437a7f750c414e77ec2b7f466d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7C71DE18A037CE1808BB4E1BA5462D93EB69C5FEB96700EDA8ADF1B3C9C753F8, cn=VASANT PANDURANG GAIKWAD
Date: 2025.05.21 14:45:58 +05'30'

( व.पां.गायकवाड )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. संचालक (१) आरोग्य सेवा, आरोग्य भवन, मुंबई
३. संचालक (२) आरोग्य सेवा, पुणे
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
५. उप संचालक, आरोग्य सेवा (सर्व परिमंडळे)
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालये (सर्व)
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर
१०. संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांच्यामार्फत)
११. निवडनस्ती सेवा-२